**सन-२०१४ मधील उप संचालक, नगर रचना (गट-अ) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

नगर विकास विभाग,

**शासन निर्णय क्रमांक**:- टिपीव्ही -२४१४/प्र.क्र.५३/नवि-२७,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक:- २१ ऑगस्ट,२०१४

**शासन निर्णय :**

संचालक, नगर रचना व मुल्यनिर्धारण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिपत्याखालील उप संचालक, नगर रचना (गट-अ) या संवर्गामधील अधिकाऱ्यांच्या, सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टिने, महाराष्ट्र नागरी सेवा (शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध) अधिनियम २००५, मधील कलम ३(१), ४(४)(एक),(दोन) व कलम ४(५) मधील तरतुदींनुसार खाली दर्शविल्याप्रमाणे बदल्या करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याची पदस्थापना/ कार्यालय | बदलीनंतरचे ठिकाण / कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्रीमती प्र.ऊ.भदाणे | उप संचालक, नगर रचना, वाहतूक व परिवहन, पुणे | उप संचालक, नगर रचना, नागरी संघ, पुणे (रिक्त पदी) |
| २ | श्रीमती सु.ब.वैजापूरकर | उप संचालक, नगर रचना, विकास योजना विशेष घटक, नाशिक | उप संचालक, नगर रचना, वाहतूक व परिवहन, पुणे (श्रीमती प्र.ऊ.भदाणे यांचे ऐवजी) (विनंतीनुसार) |

२. संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे, यांना कळविण्यांत येते की, त्यांनी बदली करण्यात आलेल्या संबंधित अधिकाऱ्यांना बदलीच्या ठिकाणी हजर होण्यासाठी कार्यालयीन आदेशाद्वारे तात्काळ कार्यमुक्त करावे. संबधीत अधिकाऱ्यांनी बदलीच्या ठिकाणी अनुज्ञेय पदग्रहण अवधीतच रुजू व्हावे. तसेच बदलीच्या ठिकाणी हजर होण्यासाठी संबंधित अधिकाऱ्यांस कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि बदलीच्या ठिकाणी सदर अधिकारी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास त्वरीत कळवावे.

३. या बदल्यांच्या पार्श्वभूमीवर, संबंधित अधिकाऱ्यांना कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिका-यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिका-यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. तसेच विनंतीनुसार करण्यात आलेल्या बदल्यांच्या अनुषंगाने संबंधित अधिकाऱ्यांना कोणताही प्रवास भत्ता, पदग्रहण अवधी इत्यादी अनुज्ञेय असणार नाही. यास्तव संचालनालयाच्या स्तरावरुन योग्य ती खातरजमा करुनच कार्यालयीन आदेश काढावेत.

४. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास त्याची संबंधित अधिका-यांच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाबाबतची ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम क्रमांक २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून त्यांच्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. संचालक, नगर रचना महाराष्ट्र राज्य, पुणे यांना कळविण्यात येते की, सदर बदल्यांच्या अनुषंगाने रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार, त्याच अथवा नजिकच्या कार्यालयातील समकक्ष दर्जाच्या अधिकाऱ्यांकडे सोपविण्यात यावा अन्यथा, बदली होणाऱ्या अधिकाऱ्याच्या संवर्गास कनिष्ठ असलेल्या संवर्गामधील त्याच कार्यालयातील ज्येष्ठ अधिकाऱ्याकडे सोपविण्यात यावा. परंतु कोणत्याही परिस्थितीत बदली होणाऱ्या अधिकाऱ्याकडे त्याच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेताक २०१४०८२१११४१०७८६२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Siddharam Karbasayya Salimath

Digitally signed by Siddharam Karbasayya Salimath
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharam Karbasayya Salimath
Date: 2014.08.21 17:12:28 +05'30'

**(एस.के.सालीमठ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.राज्यमंत्री , नगर विकास, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३) अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव, नगर विकास विभाग(नवि-१), मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-२),मंत्रालय,मुंबई.
६) महालेखापाल,महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
७) संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे. (२ प्रती)
८) संचालक तथा सह सचिव ( नगर रचना), नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
९) सह संचालक, नगर रचना नाशिक विभाग, नाशिक
१०) उप संचालक, नगर रचना पुणे विभाग, पुणे
११) उप सचिव ( आस्थापना), नगर विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
१२) उप संचालक, नगर रचना (वाहतूक व परिवहन), पुणे.
१३) उप संचालक, विकास योजना विशेष घटक पुणे.
१४) सर्व संबंधित अधिकारी (संचालक, नगर रचना,पुणे यांच्यामार्फत)
१५) निवड नस्ती (नवि-२७)